**स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत महावारसा समितीसाठी रु.४५.०० कोटी इतका निधी उपलब्ध करुन देण्यास वित्तीय मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण-८२२४/प्र.क्र.३३३/सां.का.४**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- ३१ मार्च, २०२५

वाचा :- पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग शासन निर्णय क्र.संग्रह-२०२४/प्र.क्र.२७/सां.का.३, दि.०३ फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र प्राचीन स्मारके, पुराणवस्तुशास्त्र विषयक स्थळे व अवशेष अधिनियम, १९६० चे कलम ५,६,१० व १५ मधील तरतुदीनुसार राज्य संरक्षित स्मारकांचे सुनियोजित व्यवस्थापन होण्याच्या उद्देशाने महावारसा समिती स्थापन करण्यात आलेली आहे. सदर समितीसाठी स्वातंत्र्याच्या अमृत महोत्सव अंतर्गत रु.७५.०० कोटी इतका निधी मंजूर करण्यात आलेला आहे. सदर निधी महावारसा समितीसाठी उघडण्यात आलेल्या स्टेट बँक ऑफ इंडिया येथील बचत खात्यात वर्ग करण्यास उपर्निर्दिष्ट शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आलेली आहे. आता, महावारसा समितीच्या बचत खात्यामध्ये रु.४५.०० कोटी इतका निधी वर्ग करण्यास वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत महावारसा समितीकरीता रु.४५,००,००,०००/- (रु.पंचेचाळीस कोटी फक्त) इतका निधी उपलब्ध करुन देण्यास या शासन निर्णयान्वये वित्तीय मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी महावारसा समितीसाठी उघडण्यात आलेल्या खालील स्टेट बँक ऑफ इंडिया येथील बचत खात्यात वर्ग करण्यात येईल.

| बँक खाते नाव | खाते क्रमांक | IFSC कोड | खाते प्रकार |
|---|---|---|---|
| महावारसा समिती | ४२८२००४७८९६ | SBIN०००८५८६ | Saving Account |

०२. सदरचा खर्च लेखाशीर्ष मागणी क्र.. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती, (१३) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव, (१३) (०१) स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव अंतर्गत कार्यक्रम (२२०५ ३७३३) - ५० इतर खर्च (कार्यक्रम) या लेखाशिर्षाखाली सन २०२४-२५ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

०३. संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय यांना यासाठी नियंत्रण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत असून त्यांना अथवा त्यांनी प्राधिकृत केलेल्या अधिकाऱ्यास आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर काम हे पुरातत्वीय निकषानुसार/ मानकानुसार पूर्ण करण्याची जबाबदारी संचालक, पुरातत्व व वस्तुसंग्रहालये संचालनालय व संबंधित संवर्धन वास्तुविशारद यांची असेल.

०४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णयास वित्त विभाग अनौ.सं.क्र.२७२/व्यय-१५, दि. ३१ मार्च, २०२५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

०६. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.८०/ अर्थ-३, दिनांक २५ जुलै, २०२४ व १२ फेब्रुवारी, २०२५ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी सबंधित यंत्रणा यांची राहील.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२५०३३१२१३१३१२५२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित केलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

BALASAHEB ISHWAR SAWANT

Digitally signed by BALASAHEB ISHWAR SAWANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=79fcecc76dd8693a7bfcec682ee63eee2edaf06ba586ac71715d8e6ba4d62fbe, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=327FE83917B9691D96F2C6AEB03B51A86A595CCAC9264923EA4CD090FFD03E83, cn=BALASAHEB ISHWAR SAWANT
Date: 2025.03.31 21:32:06 +05'30'

**( बाळासाहेब ईश्वर सावंत )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. मा. मंत्री (सांस्कृतिक कार्य) तथा अध्यक्ष कोअर समिती यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. अपर मुख्य सचिव, सांस्कृतिक कार्य, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव ( सां.का.३, ४ व अर्थसंकल्प ) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, मुंबई

५. संचालक, पुरातत्व व वस्तु संग्रहालये संचालनालय, मुंबई
६. कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
७. कक्ष अधिकारी (सां. का.३), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मुंबई
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१०.महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
११.महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१२.महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
१३.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१४. निवड नस्ती, सां.का.४.